**वरखेडे लोंढे (बॅरेज) मध्यम प्रकल्प ता. चाळीसगाव जि. जळगाव तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## जलसंपदा विभाग
**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०२४/(प्र.क्र.२५१/२४)/(मध्यम प्रकल्प)**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०७ मार्च २०२५

**संदर्भ**:- १) महामंडळाचे पत्र जा.क्र./ मुअ/तापाविम/कासं/प्रमा-७३ / दि.१/०३/१९९९
२) शासन निर्णय क्र. सुप्रमा /२००८/८९६/२५८/२००८ म.प्र. मंत्रालय मुंबई दि. १८/०२/२००९
३) शासन निर्णय क्र. सुप्रमा-२०१५/१३७/(प्र.क्र.१५४/१५)/म.प्र. मंत्रालय मुंबई, दि. ०९/०३/२०१८.
४) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांचे पत्र जा.क्र. तापाविम/प्रशा-५/३६४७/२०२४ दि. ०४/०९/२०२४.

**प्रस्तावना**:-

वरखेडे लोंढे (बॅरेज) मध्यम प्रकल्प ता. चाळीसगाव जि. जळगाव हा प्रकल्प तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव अंतर्गत गिरणा खो-यातील गिरणा नदीवर मौजे वरखेडे बु. या गावापासुन १.५० किमी अंतरावर आहे. प्रकल्पाचा एकूण पाणीसाठा ३५.५८७ द.ल.घ.मी. इतका असून उपयुक्त पाणीसाठा ३४.७७२ द.ल.घ.मी. इतका आहे. चाळीसगांव व भडगांव तालुक्यातील अवर्षण प्रवण क्षेत्रातील एकुण ८२९० हेक्टर क्षेत्र सिंचीत करणेचे प्रस्तावित आहे.

प्रकल्पास संदर्भ क्र. ०१ अन्वये रु ७५.६४ कोटी (दरसूची १९९७-९८) किंमतीस मूळ प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली होती. संदर्भ क्र. ०२ अन्वये या योजनेस रु. २३६.०२ कोटी (दरसूची २००७-०८) किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. संदर्भ क्र. ०३ अन्वये या योजनेस रु. ५२६.६४ कोटी (दरसूची २०१४-१५) किंमतीस द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती.

कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव, यांनी संदर्भ क्र. ०४ अन्वये सन २०२२-२३ च्या दरसुचीवर आधारीत रुपये १२७५.७८ कोटी किंमतीचा तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

सदर प्रकल्पाची तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमत रुपये १२७५.७८ कोटी असून तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता किंमत रुपये ५२६.६४ कोटीच्या तुलनेत रुपये एकूण वाढ रू.७४९.१४ कोटी आहे.

या प्रकल्पाच्या तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता छाननी अहवाल प्रस्ताव नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने मा. मंत्रिमंडळासमोर दि. १८/०२/२०२५ रोजीच्या बैठकीत सादर केला असता त्यास मंत्रीमंडळाची मान्यता प्राप्त झाली आहे.

मा. मंत्रीमंडळाने बांधकामाची सद्य:स्थिती, किंमत वाढीची कारणमीमांसा इ. बाबींचा परामर्श घेऊन वरखेडे लोंढे (बॅरेज) मध्यम प्रकल्प ता. चाळीसगाव जि. जळगाव या प्रकल्पास सन २०२२-२३ दरसूचीवर आधारित रुपये १२७५.७८ कोटी किंमतीच्या तृतीय सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

शासनाच्या या निर्णयाव्दारे वरखेडे लोंढे (बॅरेज) मध्यम प्रकल्प ता. चाळीसगाव जि. जळगाव प्रकल्पास सन २०२२-२३ दरसुचीवर आधारित रुपये १२७५.७८ कोटी (रुपये एक हजार दोनशे पंचाहत्तर कोटी अठ्ठ्याहत्तर लक्ष फक्त) किंमतीच्या तृतीय सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये १२०१.६६ कोटी (रुपये एक हजार दोनशे एक कोटी सहासष्ट लक्ष फक्त) कामाप्रित्यर्थ तसेच आस्थापना व अनुषंगिक खर्चासाठी रुपये ७४.१२ कोटी (रुपये चौ-याहत्तर कोटी बारा लक्ष फ़क्त) तरतूद आहे. उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा सोबत जोडण्यात येत आहे.

योजनेस प्रदान केलेली तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवही मध्ये अनुक्रमांक ०२/२०२५ वर नोंदवण्यात आली आहे.

➢ **तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.**

१) सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतुदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे.

२) राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या छाननी अहवालातील उपस्थित सर्व मुद्यांची पूर्तता / अनुपालन करण्यात यावे.

३) प्रकल्पाच्या द्वितीय सुप्रमाच्या अनुषंगाने बळीराजा जलसंजिवनी योजनेमधून केंद्रशासनाकडून प्राप्त होणा-या उर्वरीत निधीबाबत तसेच तृतीय सुप्रमा मान्यतेनंतर अधिकचा निधी केंद्रशासनाकडून प्राप्त करून घेण्याबाबत पाठपुरावा करावा.

४) शेत पोहोच रस्त्याचे प्रत्यक्ष कामे हाती घेण्यापूर्वी निधी उपलब्धतेबाबत खात्री करुन घेण्यात यावी तसेच निधी उपलब्ध असल्यास कामाची निविदा कार्यवाही करताना शासन परिपत्रक महसूल व वन विभाग दि. ०९.०७.२०१४ प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

५) प्रकल्प पूर्णत्वास नेण्याच्या दृष्टीने भूसंपादना करिता विशेष मोहिम राबवून विहित कालावधीत भूसंपादन पूर्ण करण्याची दक्षता घ्यावी.

६) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च न करणेची जवाबदारी महामंडळाची राहील.

७) पुनर्वसनाचे काम तातडीने हाती घ्यावे जेणेकरून प्रकल्प विहित वेळत पूर्ण करण्यात अडचण निर्माण होणार नाही, याबाबत दक्षता घ्यावी.

८) प्रकल्पासाठी आवश्यक वैधानिक व तांत्रिक मान्यता सक्षम स्तरावर घेण्यात याव्यात.

९) सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदाविषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही. अशा प्रकरणांची तपासणी त्यावेळी प्रचलित शासन निर्णयानुसार करणे आवश्यक असून याची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

१०) प्रकल्पाची अंमलबजावणी करतांना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोर अंमलबजावणी करणे, आवश्यकतेनुसार राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पूर्तता करणे याची सर्वस्वी जवाबदारी महामंडळाची राहील.

११) उपलब्ध निधीचे Thin Spreading टाळणेचे दृष्टीने प्रकल्प घटकांच्या बांधकामावरील गुंतवणुकीचा प्राधान्य क्रम निश्चित करून त्यानुसारच कामे करावीत.

१२) प्रकल्प कार्यान्वित करण्यातील पूर्ण झालेल्या घटक कामांचे घटक निहाय समाप्ती अहवाल तयार करुन सदर कामे तात्काळ व्यवस्थापनास हस्तांतरीत करावीत.

१३) शासनाने आदेशित केल्यानुसार Technical Audit करण्यात यावे.

१४) सदर प्रकल्पावर लाभधारकांची पाणी वापर संस्था स्थापन करण्यात यावी.

१५) Project Management Unit (PMU) व Dashboard स्थापन करणेबाबत व प्रकल्प विहित वेळेत पूर्ण होण्याच्या दृष्टीने विचार करावा.

या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष आय-५, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८० ,सर्वसाधारण -१९० -सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका (०२) योजनांतर्गत, (०२) (०४) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव भाग भांडवली अंशदान (४७०१-एच ७६३) या लेखाशिर्षाखाली टाकावा व त्याखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या सहमतीने मा. मंत्रिमंडळाच्या दिनांक १८/०२/२०२५ रोजी झालेल्या बैठकीमधे घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३०७१७०८३२३०२७ असाआहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सहपत्र :- उपशीर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2025.03.07 17:10:05 +05'30'

**(प्रवीण कोल्हे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत, सहपत्रांसह :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधानसचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक,मंत्रालय, मुंबई
५) अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
९) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभागयांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) महालेखापाल-१/२ (लेखापरिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
११) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव.
१२) मुख्य अभियंता (द.वप्र) व सह सचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव.

१४) उप सचिव (मो.प्र-१/मो.प्र-२/जसं/निवसं/सिंव्य/लाक्षेवि/लपा/जवि), यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

१५) आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.

१६) अधीक्षक अभियंता, जळगाव पाटबंधारे प्रकल्प मंडळ, जळगाव.

१७)वित्त विभाग (व्यय-१२/अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ ), मंत्रालय, मुंबई.

१८) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.

१९) मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

## उप शिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा

**वरखेडे लोंढे (बॅरेज) मध्यम प्रकल्प ता. चाळीसगाव जि. जळगाव प्रकल्पास तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०२४/(प्र.क्र.२५१/२४)/(मध्यम प्रकल्प).**

**दिनांक :- ०७ मार्च २०२५चे सहपत्र.**

| अ.क्र | बाब | मंजूर द्वितीय सुप्रमा नुसार | प्रस्तावित तृतीय सुप्रमानुसार | वाढ / घट (+/-) |
|---|---|---|---|---|
| १ | अ- प्राथमिक | ३.३० | २.५० | -०.८० |
| २ | ब- भूसंपादन | ७९.९९ | २३२.४१ | १५२.४२ |
| ३ | क- मुख्य कामे | २९२.०२ | ८९८.७९ | ६०६.७७ |
| ४ | ड- रेगुलेटर | १.०८ | ०.०० | -१.०८ |
| ५ | एफ़- आर. एच. टी वर्क | २३.५० | ०.५० | -२३.०० |
| ६ | जी. - पुले | १३.९३ | २०.१८ | ६.२५ |
| ७ | एच - Escape | १.१२ | ०.०० | -१.१२ |
| ८ | के- ईमारती | ४.३६ | १.४५ | -२.९१ |
| ९ | एल- मातीकाम | १४.३३ | ०.०० | -१४.३३ |
| १० | एम- लागवड | ०.६९ | ०.५० | -०.१९ |
| ११ | ओ- संकीर्ण | २.२४ | २.१२ | -०.१२ |
| १२ | पी- देखभाल | ५.१८ | ३.४६ | -१.७२ |
| १३ | क्यु- हत्यारे व अवजारे | ०.२२ | ०.२८ | ०.०६ |
| १४ | आर- दळणवळण | १.९० | १.४६ | -०.४४ |
| १५ | यु - Distributories | १६.९८ | ३२.९९ | १६.०१ |
| १६ | एक्स- पर्यावरण | ५.०२ | ५.०२ | ०.०० |
| | **एकुण कामापित्यर्थ (अ)** | ४६५.८६ | १२०१.६६ | ७३५.८० |
| | **अनुषंगिक खर्च (ब)** | ६०.७८ | ७४.१२ | १३.३४ |
| | **एकूण (अ+ब)** | **५२६.६४** | **१२७५.७८** | **७४९.१४** |

**ठळक बाबी**

अ) योजनेचे सिंचनक्षेत्र (CCA) ८२९० हेक्टर आहे.

ब) लाभव्यय गुणोत्तर – १.६४ (१.५० पेक्षा जास्त)

क) आर्थिक परतावादर (IRR) – १३.९६ %

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2025.03.07 17:10:36 +05'30'

**(प्रवीण कोल्हे)**
**शासनाचे उप सचिव**